जगातील महान कलाकार

# फ्रिडा काअलो







लेखक – माईक व्हेनेझिया





फ्रिडा काअलो ही विसाव्या शतकातल्या काही महान मेक्सिकन कलाकारांपैकी एक. तिचा जन्म १९०७ मध्ये मेक्सिकोतल्या कोयोअकान इथे झाला. फ्रिडाच्या आयुष्याची सुरुवातीची काही वर्षे म्हणजे मेक्सिकन क्रांतीचा कालखंड होता. तिच्या आयुष्यावर या घटनेचा मोठाच प्रभाव पडला आणि मेक्सिकोचे कलाविश्व कायमचे बदलून गेले.



फ्रिडाची काही सुप्रसिद्ध चित्रे म्हणजे तिच्या स्वतःच्याच तसबिरी आहेत. त्यातील बऱ्याच चित्रांमध्ये तिने स्वतःला महत्त्वाच्या वाटणाऱ्या गोष्टी अवतीभवती दाखवल्या आहेत.



फुले, झाडे, जंगले, प्राणी यांची चित्रे काढायला फ्रिडाला विशेष आवडत. तसेच कपडे, दागिने आणि केवळ मेक्सिकोतच दिसून येणारे प्राचीन देवीदेवता यांची चित्रे काढणेही तिला फार आवडे.



आपल्या आयुष्यात घडलेल्या काही नकोशा घटनाही फ्रिडा खूपदा चित्रांमधून दाखवी. क्वचित ही चित्रे बघून लोकांना धक्काही बसतो. पण कठीण काळातून सावरण्यासाठी तशी चित्रे काढणे फ्रिडाला आवश्यक होते.

पुढील पानावर दाखवलेले चित्र आहे *आशाविहीन.* एका गंभीर आजाराच्या वेळेस तिने हे काढले होते. फ्रिडा अगदी अशक्त झाली होती. तिची भूकही मेली होती. डॉक्टरांनी तिला पुष्कळ प्रमाणात द्रवस्वरूपातील पदार्थ घ्यायला सांगितले होते. जबरदस्तीने खाण्याच्या कल्पनेने फ्रिडाला शिसारी आली होती. आपली ही भावना तिने चित्रातून व्यक्त केली. यातील अस्वस्थ करणारी बहुतेक सर्व चित्रे फ्रिडाने स्वतःसाठी काढली होती. दुसऱ्या कोणी त्यात रस दाखवला तेव्हा तिला फार आश्चर्य वाटले.



फ्रिडा काअलोला आयुष्यभर खूप त्रासाला आणि वेदनांना सामोरे जावे लागले. पाच वर्षांची असताना तिला पोलिओ हा गंभीर आजार झाला. त्यातून ती बरी झाली खरी पण या आजारामुळे तिचा उजवा पाय कायमचा अशक्त झाला.

तिच्या पायातली ताकद परत यावी म्हणून आईवडिलांनी तिच्याकडून पुष्कळ शारीरिक व्यायाम करून घेतले. त्यात फुटबॉल, पोहणे, सायकल चालवणे आणि चक्क बॉक्सिंगचाही समावेश होता !





त्या कशाचाच विशेष उपयोग दिसून आला नाही. शेजारपाजारची मुले तिला “लंगडी फ्रिडा” म्हणून चिडवू लागली.

आपला पाय लपवण्यासाठी फ्रिडा पायघोळ झगे आणि विजारी घालू लागली. आपण इतरांपेक्षा वेगळ्या आहोत हे सर्वांना कळावे किंवा त्यांनी आपली कीव करावी किंवा चेष्टा करावी असे तिला मुळीच वाटत नव्हते.






फ्रिडा कायम झाडे, दगड, कीटक नाहीतर लहानसहान प्राणी निरीक्षण करण्यासाठी  घरी घेऊन येत असे. श्री. काअलोंचा छायाचित्रणाचा व्यवसाय होता. ते एक हौशी कलाकारदेखील होते. त्यांनाही अनेक गोष्टींविषयी कुतूहल वाटे.



लहानपणी फ्रिडा काअलोला खूप गोष्टींचे कुतूहल होते. विशेषतः निसर्ग आणि विज्ञान जाणून घ्यायची तिची खूप इच्छा असायची. तिच्या वडिलांना ही गोष्ट आवडली आणि त्यांनी तिला जास्तीतजास्त शिकण्यास प्रोत्साहन दिले.

त्यांनी आपल्या मुलीला मेक्सिकन कला आणि वास्तुशास्त्राचे ज्ञान दिले. कॅमेरा कसा वापरायचा तसेच छायाचित्रांमध्ये रंग कसे भरायचे इत्यादी बारकावेही तिला शिकवले. या गोष्टींचा नंतर कलाकार म्हणून काम करताना फ्रिडाला उपयोग झाला.

फ्रिडा देशातल्या एका उत्कृष्ट शाळेत शिकली. ही शाळा मेक्सिको सिटीत अगदी मध्यवर्ती ठिकाणी होती. आपल्या देशातल्या जनतेसाठी मेक्सिकन क्रांतीचे काय महत्त्व होते हे फ्रिडाला शाळेत शिकायला मिळाले.





क्रांती होण्यापूर्वी हजारो लोकांना गुलामासारखे वागवले जाई. ही माणसे अगदी गरीब आणि अशिक्षित होती. त्यांच्यापैकी बहुतेक सर्वजण दिवसभर शेतावर काम करत. काही लोभी सरकारी अधिकारी आणि जमीनदार कामातून येणारा सगळा पैसा बळकावून स्वतःकडेच ठेवत.

१९१० साली पांचो व्हिला आणि एमिलिआनो सपातासारख्या नेत्यांच्या साहाय्याने मेक्सिकन जनतेने मेक्सिकन सरकारविरुद्ध बंड केले. त्यानंतर मेक्सिकोत सर्वांना समान न्यायाने आयुष्य जगण्याचा अधिकार मिळाला.







नवीन मेक्सिकन सरकारने पहिली गोष्ट काय केली असेल तर सार्वजनिक भिंतींवर मोठाली दृश्ये रंगवून घेण्यासाठी कलाकारांना बोलावून घेतले. या भित्तीचित्रांमधून मेक्सिकोचा इतिहास सर्वांना बघता येत होता. अशिक्षित लोकांना आपला भूतकाळ समजून घेता यावा, त्यांना आपल्या देशाचा अभिमान वाटावा आणि भविष्याची आशा वाटावी असे या चित्रांमागचे उद्‌देश होते.





डेव्हिड सिक्वेरोस, होसे ओरोहक्को आणि दिएगो रिव्हेरा हे सर्वात प्रसिद्‌ध भित्तीचित्रकार होते. प्राचीन मेक्सिकन संस्कृतीतील कला आणि रंगसंगती यावरून त्यांनी प्रेरणा घेतली होती. होसे पोसादाची जिवंत चित्रे हा मेक्सिकोतील लोकप्रिय कलाप्रकार होता. त्याच्या कामाचा या कलाकारांवर मोठा प्रभाव होता. मेक्सिकन क्रांतीपूर्वी युरोपियन शैलीतील कलेलाच लोकमान्यता मिळाली होती. या शैलीच्या प्रभावापासून ते जाणीवपूर्वक दूर राहिले.





फ्रिडा चौदा वर्षांची असताना दिएगो रिव्हेरा एक भित्तीचित्र रंगविण्यासाठी तिच्या शाळेत आला. शाळेत असताना फ्रिडा खोडकर म्हणून प्रसिद्ध होती.

आपल्या शिक्षकांना तिने चांगलेच जेरीस आणले होते. सुप्रसिद्ध दिएगोदेखील त्यातून सुटला नाही. तो काम करत असताना तिने त्याच्या पुष्कळ खोड्या काढल्या आणि “जाडा म्हातारबाबा” असे म्हणत त्याला चिडवले सुद्धा.



आयुष्यात एक वाईट घटना घडेपर्यंत फ्रिडाला कलेत फारसा रस वाटायला लागला नव्हता. एक दिवस घरून शाळेत जात असताना तिच्या बसला भयानक अपघात झाला. काही लोक मारले गेले. फ्रिडाला खूप जखमा झाल्या आणि काही महिने तिला झोपून काढावे लागले. तिच्या हाडांना झालेले नुकसान कधीच पूर्ण भरून आले नाही. तिला पुष्कळ वेदना होत आणि तिच्यावर बऱ्याच शस्त्रक्रियादेखील कराव्या लागल्या.

याचवेळेस फ्रिडाने कलेत मन रमवायचे ठरवले. तिला झोपून झोपून कंटाळा आला होता. काहीतरी करणे आवश्यक होते. फ्रिडाने आपल्या वडिलांचे रंग आणि ब्रश मागून घेतले. तिला पाठीवर झोपून काम करता यावे म्हणून तिच्या आईने खास कॅनव्हास तयार करून घेतला.



फ्रिडाने आपल्या मित्रमैत्रिणींच्या, घरच्यांच्या तसबिरी काढण्यापासून सुरुवात केली. तिने स्वतःचीही पुष्कळ चित्रे काढली. तो तर तिच्या खास माहितीचा विषय होता.

सुरुवातीला फ्रिडाच स्वतःची शिक्षिका बनली. तिने आपल्या वडिलांकडे असलेल्या कलेच्या पुस्तकांचा अभ्यास केला. बोतीचेल्ली आणि मोदिलीयानी सारख्या युरोपियन कलाकारांची चित्रे तशीच्या तशी उतरवली.





या चित्रांमधे काहीतरी जादू जाणवत असे. मेक्सिकोतील अनेक लोकांना ती आपल्या रोजच्या आयुष्याचाच एक भाग वाटत. मेक्सिकोतील रेड-इंडियन जमातींच्या कलेत आणि धार्मिक चित्रांमध्ये फ्रिडाला एक गूढ शक्ती जाणवत असे.



मात्र लवकरच मेक्सिकन भित्तीचित्रकारांप्रमाणे फ्रिडाला देखील आपल्या देशातील लोककलेत जास्त रस वाटू लागला. फ्रिडाला त्या कलेतील उर्जा आणि त्यातून सांगितल्या जाणाऱ्या साध्याशा गोष्टी आवडल्या.

मेक्सिकन लोककलेतून सापडलेल्या गोष्टींचा समावेश फ्रिडा स्वतःच्या चित्रांमध्ये करू लागली.





फ्रिडाला चित्रे काढणे आवडू लागले. त्याने तिला बरे वाटत असे. लवकरच तिला हिंडण्याफिरण्याइतके बरे वाटू लागले. आयुष्याचा आनंद घेण्याच्या मार्गात आपल्या वेदनांचा अडसर होऊ द्यायचा नाही असे तिने ठरवले. ती आपल्या चित्रांवर काम करत राहिली, मित्रमैत्रिणींबरोबर वेळ घालवू लागली आणि पुष्कळ पार्ट्यांनाही जाऊ लागली.

अशाच एका पार्टीत तिची ओळख दिएगो रिव्हेराशी करून देण्यात आली. फ्रिडा आता मोठी झाली होती आणि बरीच वेगळी दिसू लागली होती. त्यामुळे दिएगोने तिला ओळखले नाही.

काही दिवसांनी दिएगो एक भित्तीचित्र काढत असताना फ्रिडा तिथे आली. तेव्हा मात्र त्याला तिची ओळख पटली. तिला आपल्या काही कलाकृती दिएगोला दाखवायच्या होत्या आणि त्याचे मत जाणून घ्यायचे होते. काही वर्षांपूर्वी तिने दिएगोच्या खोड्या काढल्या असल्या तरी ती त्याच्यामुळे प्रभावित झालेली होती. तिला त्याच्या प्रतिभेबद्दल आदर वाटत असे.





दिएगोला फ्रिडाचे काम खूपच चांगले वाटले. फ्रिडा आता मोठी झाली होती तेव्हा त्याला तीही आवडली. फ्रिडाने आपण काढलेली चित्रे बघायला दिएगोला घरी बोलावले.

दिएगो बऱ्याचदा काअलो कुटुंबाच्या घरी जाऊ लागला. त्याची आणि फ्रिडाची एकमेकांशी चांगलीच ओळख झाली आणि ते एकमेकांना नियमित भेटू लागले. काही काळाने ते एकमेकांच्या प्रेमातही पडले. दिएगो फ्रिडाहून वीस वर्षांपेक्षा जास्त मोठा होता. तरीही त्यांनी लग्न करायचे ठरवले.



दिएगोने फ्रिडाच्या कलेला कायम प्रोत्साहन दिले. त्याला आपल्या हुशार पत्नीचा अभिमान वाटत असे. फ्रिडा दिएगोंकडून बरेच काही शिकली. तो तिच्या दृष्टीने एक उत्तम कलाशिक्षक ठरला.

फ्रिडा काअलो आता जगातल्या एका सुप्रसिद्ध कलाकाराची पत्नी होती. सुरुवातीला आपल्या पतीला हवे-नको बघणे एवढेच तिला ठीक वाटत होते. दिएगो काम करत असताना दररोज त्याच्याबरोबर वेळ घालवणे फ्रिडाला आवडे. पण ती स्वतः मात्र विशेष चित्रे काढत नव्हती.

१९३० मध्ये दिएगोला अमेरिकेत भित्तीचित्रे काढण्यासाठी बोलावले गेले. दिएगो आणि फ्रिडा सतत अमेरिकेला जाऊ लागले. ते दोघे जिथे जात तिथे त्यांचे कौतुक होई. त्यांचा जोडा शोभून दिसत असे आणि त्यांचा सहवासही लोकांना हवाहवासा वाटे. फ्रिडा आणि दिएगोला श्रीमंत आणि प्रसिद्ध लोकांच्या पार्ट्यांचे सतत आमंत्रण असे.





अर्थात, दिएगो आणि फ्रिडाचे सगळेच काही छान चालले होते असे नाही. त्यांच्यात बऱ्याचदा गंभीर मतभेद होऊ लागले. त्यातला एक मतभेद आपण अमेरिकेत किती काळ राहायचे  यावरून होता. दिएगोला आधुनिक अमेरिकन शहरांमध्ये राहायला आवडे पण फ्रिडाचे मन मात्र तिथे रमत नसे. तिला घरची खूप आठवण येई आणि मेक्सिकोला परत जावेसे वाटे.

पुढील पानावर दाखवलेले फ्रिडाचे चित्र तिच्या अमेरिकेविषयीच्या भावना व्यक्त करते. तिने अति गर्दी असलेल्या न्यूयॉर्क शहराचे चित्र काढून त्यात कारखाने, कचरा आणि प्रदूषण दाखवले आहे. या चित्रात फ्रिडा कुठेच नाही. बहुधा आपला एक झगा तेवढा मागे ठेवून ती मेक्सिकोला परत गेली असावी.



कधीकधी फारच गंभीर मतभेद झाले तर फ्रिडा आणि दिएगो वेगळे राहात. या काळात फ्रिडा चित्रे काढण्यात जास्त वेळ घालवत असे. तिची काही उत्तमोत्तम चित्रे याच काळातली आहेत.





फ्रिडा काअलोने तिच्या खऱ्याखुऱ्या भावना अनोख्या पद्धतीने चित्रातून उतरवल्या. हळूहळू तिचे काम तिच्या पतीच्या कामाइतकेच प्रसिद्ध होऊ लागले. फ्रिडा चित्रांमधून आपला आनंद, निराशा, वेदना व्यक्त करू लागली. तिच्या चित्रांमध्ये मेक्सिकन रंगसंगती आणि प्रतिमांचा मुबलक वापर केलेला दिसतो. स्वतःच्या देशावर इतके प्रेम करणारी एखादी व्यक्तीच असे करू शकते.





फ्रिडा काअलोला आयुष्यभर प्रकृतीची गंभीर चिंता भेडसावत राहिली. १९५४ साली तिचा मृत्यू झाला. त्यापूर्वीच फ्रिडाने आयुष्याचा जमेल तसा आनंद घ्यायचे ठरवून टाकले होते.

ती आपला बराच वेळ केशभूषा करण्यात आणि सुंदर कपडे परिधान करण्यात घालावी. तिची मित्रमंडळी सांगत की, अशी तयार होऊन बाहेर पडल्यावर ती स्वतःच एखाद्या कलाकृतीसारखी दिसत असे.

**समाप्त**